**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५०७/प्र.क्र.१५०/०७/१४-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १३ जानेवारी, २०१५

वाचा :- १) सा.प्र.वि.चे आदेश क्र.एएससी १५०७/प्र.क्र.१५०/०७/१४-अ, दिनांक १६.७.२००९
२) सा.प्र.वि.चे आदेश क्र.एएससी १५०७/प्र.क्र.१५०/०७/१४-अ, दिनांक ३०.७.२०१४

## शासन आदेश

संदर्भाधिन क्रमांक २ येथील आदेशान्वये श्री.रो.पुं.खळे (अ.जा.), निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी) यांना उच्चश्रेणी लघुलेखक पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली आहे.

२. श्री.खळे यांना कनिष्ठ असलेल्या श्रीमती सुराडकर, (अ.जा) यांना, संदर्भाधिन क्रमांक १ च्या आदेशान्वये उच्चश्रेणी लघुलेखक पदावरील पदोन्नतीचा दिनांक ०१.१२.२००६ हा नियमित दिनांक देण्यात आलेला आहे.

३. श्री.खळे यांना संदर्भ क्र. २ च्या आदेशान्वये उच्चश्रेणी लघुलेखक पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती या आदेशान्वये विनियमित करुन त्यांना दिनांक ०१.१२.२००६ हा उच्चश्रेणी लघुलेखक पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक देण्यात येत आहे.

४. सदर ज्येष्ठतेचा दिनांक हा शासन अधिसूचना सा.प्र.वि.क्र. एसआरव्ही १०७६/बारा, दिनांक २१.०६.१९८२ नुसार फक्त उच्चश्रेणी लघुलेखक संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्याकरिता विचारात घेण्यात येईल .

५. श्री.खळे, निम्नश्रेणी लघुलेखक यांना उच्चश्रेणी लघुलेखक पदावर देण्यात आलेली नियमित पदोन्नती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणातील याचिका क्र.T.A.No.१/२०१४ आणि T.A.No. २/२०१४ (याचिका क्र.८४५२/२००४) संदर्भात मा.प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २८.११.२०१४ रोजी दिलेल्या निर्णयातील निर्देशांच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

६. श्री खळे, निम्नश्रेणी लघुलेखक यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतननिश्चितीचा विकल्प सदरहू आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११(१)(ए) खालील तरतूदीनुसार नियमित पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११३११४४३०४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suchita Mohan Mahadik

Digitally signed by Suchita Mohan Mahadik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suchita Mohan Mahadik
Date: 2015.01.13 11:57:04 +05'30'

**(सुचिता मो. महाडिक)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत** :- श्री रो.पुं.खळे, उच्चश्रेणी लघुलेखक,आदिवासी विकास विभाग (संबंधित विभागामार्फत)

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७) प्रधान सचिव / सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) सह/उप सचिव (आस्थापना), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन १४-अ)